# इरावतीच्या गोष्टी

श्रीनिवास पंडित

मुखपृष्ठ व आतील चित्रे - राजू देशपांडे






# इरावतीच्या गोष्टी

श्रीनिवास पंडित

मुखपृष्ठ व आतील चित्रे - राजू देशपांडे




बी ४, संकुल कॉन्डोमिनियम, एरंडवणे, पुणे ४११००४.
फोन : २५४३२३७४
इ-मेल : urjaprakashan@yahoo.co.in
वेब : www.urjaprakashan.com

**मुद्रक** : श्री अंबिका ऑफसेटस्, पुणे २.

**प्रथम आवृत्ती** : एप्रिल २०११

**मूल्य** : रु. ४५/-



## गाडी निघाली

इरावती होती चार वर्षांची अन् तिचा भाऊ ईशान नऊ वर्षांचा - तिसरीत. सगळ्या मुलांसारखं त्यांनाही गोष्टी ऐकायला खूप आवडायच्या. पण त्यांचे आई-बाबा, आत्या, आजी - सगळे खूप वाचायचेसुद्धा. त्यांच्या घरी खूप पुस्तकं होती. म्हणून ईशान - इराला पुस्तकं बघायलाही खूप आवडायची.

ईशान आत्ताआत्ता गोष्टींची छोटीछोटी पुस्तकं वाचायला लागला होता. त्यामुळं इरालाही पुस्तकं हवी असायची; अन् अर्थात ईशान वाचत असेल, तेच पुस्तक! मग दोघांची भांडणं, चिडणं व्हायचं. कधी समजूत पटायची, तर कधी रडारडी व्हायची.

हा नेहमीचा कार्यक्रम झाला की, इरावती पुस्तक उघडून बसायची; मोठ्यानं वाचायला लागायची, 'कोल्हा व बगला'. पूर्वी समोरच्या पानावर तीच गोष्ट असेल याची खात्री नसायची. पण हल्ली हल्ली तिला चित्रावरून गोष्ट कळायची. पण बरेचदा कोल्ह्याची खीर खाऊन होण्यापूर्वीच (खरं म्हणजे न खाऊन होण्यापूर्वी) तिला त्या पानावर, ईशानला नुकतीच शिकवलेली गोष्ट वा कविता दिसायला लागायची.

कारण गोष्टींच्या पुस्तकांहूनही तिला ईशानची अभ्यासाची पुस्तकं-वह्या जास्त आवडायची. त्याच्या बहुतेक गोष्टी, कविता तिलाही पाठ झाल्या होत्या. आई-बाबांचीही पुस्तकं तिनं (वाचून) बघितली होती, पण त्यामुळं मोठ्यांच्या पुस्तकांविषयी तिचं मत वाईट झालं होतं. चित्रं नसलेली, जाड-जड पुस्तकं ते का वाचतात? याचं कोडं तिला पडलं होतं. बाकी घरी येणारे पेपर, मासिकं, पत्रं बघायला तिला खूप आवडायची.



थोडक्यात, मुद्दाम तिच्यासाठी म्हणून आणलेली आकार, रंग, वाहनं, पशुपक्षी यांची छोटीशी पुस्तकं अन् अंक-अक्षरं यांचे तक्ते सोडून बाकी काहीही छापील बघायला तिची ना नसायची.

पण हे सगळं चालायचं दिवसा. रात्री जेवायची, झोपायची वेळ झाली की मग मात्र तिला आई-आजीकडूनच गोष्ट हवी असायची. त्याही कोल्हा-बगळा, मांजर-माकड अशा ठराविक गोष्टींपैकीच. त्यातही कुणीतरी घसरून पडतं, कुणाची शेपूट तुटते, ढुंगी भाजते अशा गोष्टी तिला जास्त प्रिय होत्या.

या किंवा तिच्या प्रवासाच्या. आईनं कितीही आरडाओरडा केला, लाडीगोडी, लालूच दाखवली, तरी ती हातानं जेवायची नाही अन् वेगळी गोष्ट ऐकायची नाही.

तिच्या प्रवासाच्या म्हणजे ती आत्याच्या अहमदनगरच्या शेतातल्या घरी गेली होती, डोम्बीवलीला आजोळी रेल्वेनं आणि ते सगळे जीपनं कोकणात गेले होते, त्या प्रवासाच्या गोष्टी. आई चिडून म्हणायचीसुद्धा, ''हिच्या प्रवासाच्या गोष्टी? स्वतःला काय सिंदबाद समजते का रिचर्ड बर्टन? अजून-'' पण त्यावर ईशाननं 'आई, सिंदबाद कोण? त्याची गोष्ट सांग ना' असं म्हणल्यामुळं तिनं घाईघाईनं विषय बदलला होता.

अन् या प्रवासाच्या गोष्टीही इराला साग्रसंगीत, सविस्तर हव्या असायच्या. म्हणजे गोष्ट संपवायला आईनं 'लोणावळ्याला चिक्की घेतली' असा शॉर्टकट घेतला, तर इरावती ''एऽऽ, असंऽऽ नाही, दोन मिक्स अन् एक काजूची घेतली ना? अन् जेली? ते सांग ना.'' असं म्हणायची किंवा ''आपण रिक्षात बसलो, स्टेशनवर पोचलो.'' एवढं तिला पुरायचं नाही. ''एऽऽ थांब. रिक्षात जागा नव्हती, म्हणून तू ढब्ब्या हर्षूला (तिच्या आत्येभावाला) मांडीवर घेतलंस. मग तुझे पायच दुखायला लागले. ते सांग ना'' हे प्रत्येकवेळी सांगायला लागायचं. गोष्टीची पॅसेंजर अशी रडत-खडत, धक्के खात जायची.



इरावतीला यापैकी सगळ्यात जास्त आवडायची कोकण (तोतन) ट्रीपची गोष्ट, कारण त्यात असंख्य गाई-म्हशी, शेळ्या होत्या, ते उतरले होते, तिथला बोबडं, गोड कोकणी बोलणारा तिचा मित्र संजू होता, दोघांनी मिळून तिथल्या हम्माच्या हरणासारख्या पिल्लाला (न घाबरता!) चारा दिला त्याचं वर्णन होतं, रहाट-गाडग्याची खोल विहिर होती, भलामोठा समुद्र, त्यात इरा कशी न घाबरता शिरली त्याचं कौतुक अन् बोटीचा प्रवास होता. त्या आठवणी तिथून आणलेल्या शंखशिंपल्यांसारख्या कधीही हाताळायला तिला आवडायच्या... अन् सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे तिथली वानरं.

ते उतरले होते, ते घर भलंमोठं, लाल दगडांचं, कौलारु होतं. घराभोवती नारळी-सुपारीची बाग होती. एका दुपारी आठ-दहा वानरांची टोळी बागेत घुसली. दोन तास त्यांची दंगामस्ती, माकडचेष्टा इरावतीनं मोठ्या डोळ्यांनी, श्वास रोखून पाहिल्या. त्यातल्या छोट्याशा पिल्लाला तिला खरंतर घरीच आणायचं होतं; कमीतकमी कडेवर घेऊन त्याचे खूप पापे तरी घ्यायचे होते. इतके वेळा गोष्ट ऐकल्यामुळे आपण त्या पिल्लाला हात लावला असं मात्र तिला मनोमन वाटत होतं.

या गोष्टींवरून ईशान तिला खूप चिडवायचा. त्या कशा फुसक्या, छोट्या मुलींच्या गोष्टी आहेत हे सतत सांगायचा. या गोष्टी सुरू झाल्या की मुद्दाम टीव्ही लावून, पुस्तक उघडून बसायचा. पण त्याचे कान मात्र असायचे गोष्टीकडेच.

पण या तीनच गोष्टी कोणताही मोठा माणूस रोज रोज असं किती वेळा सांगू शकेल? आजोबांचा तर काही उपयोगच नव्हता. एक तर यातल्या एकही ट्रीपला ते नव्हते. त्यामुळं तिथलं काहीही आजोबांना ठाऊक नाही याची इराला खात्री होती. डोम्बीवलीला कुकगाडीनं जायला लागतं, तर नगरला बस जाते, हम्मा नगरला असतात पण वानरं (माकडं नाही हो आजोबा!) मात्र कोकणातच असतात हे ती आजोबांना बजावून सांगायची. पण आजोबांच्या ते लक्षातच राहायचं नाही.

बाबा आपला बघावं तेव्हा कामात दंग किंवा बाहेरगावी. आई रात्री थकून जायची. कधी एकदा इरा जेवून झोपत्ये असं तिला व्हायचं. मग ''तर... आम्ही निघालो... ईशान, औषध घेतलंस?... पण स्टेशनवर ... गॅस बंद केला ना मी?'' अशी कशीबशी गोष्ट व्हायची. त्यातल्यात्यात आजी मात्र शक्य तेवढं रंगवून, पूर्ण गोष्ट सांगायची.

पण एकदा आजी-आजोबा गेले होते गावाला. आई जास्तच थकून आली होती. इरावतीनं कशावरूनतरी जेवताना भोकाड पसरलं. आईनं तिची समजूत घालायचा थोडा प्रयत्न केला, पण इराचे हुंदके काही थांबेनात. मग आईनं सरळ तिला उचललं अन् (बाबाजवळ, गादीवर) आदळलं. तेव्हा ती काय म्हणाली ते मी सांगत नाही. चिडल्यावर सगळ्या आया बोलतात तेच. मग तिनं बाबाला सांगितलं, ''आजपासून मी या मुलीला भरवणार नाही. चार वर्षांची घोडी! तो ईशान बघ. त्याचं मला कधीही करायला लागलं नाही. नाहीतर ही-''

आता हे काही खरं नव्हतं. ईशान लहान असताना आई त्याला दुसरं कुणाचंतरी उदाहरण द्यायची. पण हे ऐकल्यावर ईशाननं साळसूदपणे इराकडं पाहिलं. त्यामुळे इराच्या रडण्याचा स्फोट झाला. आई आणखी चिडली. ''आजपासून तू हिला भरवायचं अन् झोपवायचं.''

एवढा वेळ बाबा गूपचूप सगळं काही ऐकत होता. आता मात्र तो दचकला. ''अगं... पण... हे काय?... मला-''

''तू काय बोलणारेस ते मला सगळं माहित्ये. ती तुझ्याकडून भरवून घेणार नाही, तुला याची सवय नाही... हो ना? मलाही काही दहा लहान भावंडं नव्हती.''



बाबानं परत बोलायला तोंड उघडलं, पण आई आज काही ऐकून घेणार नव्हती. ''पुढचं सांगू? खूप कामं राहिल्येत, उद्या सबमिट केलंच पाहिजे. हेच ना? पण मीही काही गोट्या खेळत नाही. आजपासून- हिचं- रात्रीचं - सगळं - तू - बघायचं. कळलं?''

आईबाबा एकमेकांकडे नजर रोखून बराच वेळ बघत राहिले. बाबानं कॉम्प्युटर बंद केला. इराला जवळ घेतलं. ''चल, आजपासून मी तुला गोष्ट सांगणारे. कुठली सांगू?''

''तूऽऽ नाईऽऽ तुला येत नाई ऽऽ आई ऽऽ''

''आईला खूप कामं आहेत. मी सांगतो. कुठली सांगू?''

''तोतनाची'' रडणं, हट्ट सगळं विसरून इरावतीचं प्रॉम्प्ट उत्तर.

''बघितलंस, कशी कांगावखोर आहे? दोन मिनटांपूर्वी -''

''बाबा, गोस्त.'' (खरं तर इरावती बोबडी वगैरे राहिली नव्हती. पण तोतन आणि गोस्त हे शब्द मात्र ती मुद्दामून तसेच उच्चारायची.)

''सांगतो ना. पण दुसरी, छान सांगतो. ती-''

''नाईऽऽ. मला तोतनाचीच पाहिजे.''

बाबानं इराकडं पाहिलं. तिचा चेहरा किती आईसारखा आहे असं त्याला अनेकदा वाटायचं. ते आत्ताही त्याच्या लक्षात आलं. निःश्वास टाकून त्यानं गोष्ट सांगायला सुरुवात केली. ''तर... एकदा... इरा अन् तिच्या घरच्यांनी -''

एवढा वेळ ईशान शहाण्या मुलासारखा पुस्तक उघडं ठेवून बसला होता. तो बाबाजवळ सरकला.



## चार्जिंग

असे पाच-सहा दिवस गेले. त्यात दोन-दोनदा नगर, डोम्बीवली अन् चार वेळा कोकणची गोष्ट सांगून झाली. गोष्ट सांगायच्या आधी प्रत्येक वेळा तो इराला म्हणायला, ''आज तुला नवीन गोष्ट सांगतो. एकदम मस्त आहे. ही बघ ससा, कोल्हा -''

''नाई. मला नको. माला तोतनाचीच पाहिजे.''

गोष्ट झाली. पण बाबाचा धीर संपला. नंतर तो आईला काकुळतीनं म्हणाला, ''प्लीज, ही कोकणची गोष्ट नको. हे चालू राहिलं, तर ट्रीपला जायची हिम्मत होणार नाही माझी. कुणी नुसतं 'को' म्हणालं ना, तरी भीती वाटते. कोकम सरबतदेखील पीत नाही मी हल्ली. कोका कोलाची जाहिरात बघितली-''

''अतिशयोक्ती बास बरं का.''

''अतिशयोक्ती नाही, खरंच... पाहिजे तर मी रात्रीची आवराआवरी करत जाईन, पण ही गोष्ट नको बाबा.''

''आवराआवरी वगैरे तुला जमणार नाही. उलट माझीच कामं वाढवून ठेवशील.. अन् कळलं ना, काय होतं ते? तू चार दिवसांत कंटाळलास, मी चार महिने सांगतेय; अन् मला पूर्वी सांगायचास ना, कुठलंही काम करायला लागणारच असेल, त्यापासून सुटका नसेल, तर ते आनंदानं करावं? त्यात काय शिकता येतंय, वेगळं-नवीन करता येतं ते बघावं? मग आता तू शिक ना.''



नंतर, जरा निवांतपणा मिळाल्यावर आई म्हणाली, ''हल्ली किती चिडचीड करतोस तू. नेहमी म्हणतोस ना, सगळं रूटीन चाललंय, काही वेगळं करताच येत नाहीये? मग ही संधी आहे असं समज ना.''

खरंच, बाबा कॉलेजात असताना काय काय करायचा. नाटक, गाणं, कविता, ट्रेकींग, निवडणुका. पण नंतर नोकरी, लग्न, मुलं यात ते सगळं मागं पडलं. पण अजून तो खूप काही काही वाचायचा. त्याचे मित्रही खूप वेगवेगळ्या गोष्टी करणारे होते.

''अगं, आता कसं जमेल ते? बघत्येस ना तू -''

''प्रयत्न तर कर. नाहीतर आहेच- तोतनाची गोस्त! अन् दोन-चार वर्षांनंतर ती म्हणणारसुद्धा नाही, गोष्ट सांग म्हणून. तेव्हा हळहळशील.''

त्या दिवशी शनिवार होता. रात्री उशीरापर्यंत बाबा खूप पुस्तकं उघडून बघत बसला.



## हिरवा सिग्नल

''आईनं माकडूला पोटाशी आवळलं, ती उडी मारणार, तेवढ्यात माकडूनं स्वत:ला सोडवलं. तो इराकडं धावला. इरा, ईशान त्याच्याकडे खिडकीतनं बघत होते. आईनं त्याला खस्सकन ओढलं अन् ती म्हणाली, ''एवढा वेळ खेळ झाला, तरी घरी यायचं नाही? आता कुठं निघालास?''

इथपर्यंत गोष्ट काही सरळ आली नव्हती. बाबानं प्रवासवर्णन वगैरे थोडक्यात आटोपल्यावर इरानं कटकट केलीच. पण बाबानं एवढ्या फास्ट गोष्ट माकडूपाशी आणली की, इरा मधले स्टॉप विसरली. ती, ईशान, एवढंच काय, आईसुद्धा नीट गोष्ट ऐकायला लागली.

''माकडूला आईचा रागच आला. खरंतर तो भोकाडच पसरणार होता. पण इरा, ईशान सगळे बघत होते ना! तो आईला म्हणाला, ''अगं, ती इरावती आल्ये पुण्याहून. तिनं मला गोळ्या-चॉकलेटं आणल्येत. तेवढी पटकन् घेऊन येतो.''

('बाबा, पण त्याला माझं नाव कसं कळलं?'

'अगं, तो अगदी घराजवळच्या झाडावर बसला होता ना, तेव्हा त्यानं ऐकलं असेल.' ईशान.)

''चॉकलेट? आत्ता बागेत कायकाय खाल्लंय आपण. आंबे, पपया, केळी... तू तर वाळवणातली कोकमं, सांडगेसुद्धा खाल्लेस... तसंही तू कडू, तिखट काही खात नाहीसच, नुसतं गोड. त्यात आणखी चॉकलेट - ते माणसांचं खाणं? दात किडतील, पोट बिघडेल, माहित्ये ना? काही घ्यायचं नाही ते.''

असं ओरडून आईनं माकडूला पोटाशी घेतलं अन् ते घरी गेले.''



''मग?'' ईरानं विचारलं.

''मग काही नाही. आजची गोष्ट संपली. बाकीची उद्या.''

''एऽऽ एवढीशी काय गोष्ट बाबा?''

''एवढीशी?'' मग आवाज बदलून बाबा म्हणाला, अगं, झोपलो ना, की माकडू माझ्या स्वप्नात येईल. माझ्याशी बोलेल, गंमती सांगेल. मग मोठी गोष्ट तयार होईल.''

इरा झोपल्यावर बाबानं आईला विचारलं, ''काय ग, कशी झाली गोष्ट?''

''ठीक.''

''ठीक? फक्त ठीक?''

''अरे, किती दिवसांनी तू विचार करायला लागलास. वेळ लागेलच ना. पहिल्याच प्रयत्नात ग्रेट गोष्ट होणारे? का तुला बरं वाटावं म्हणून तसं म्हणू?''

''नाही, खरं तेच सांग... अन् तू म्हणतेस ते बरोबर आहे.''

पण बाबाला मात्र मनातून आपण काहीतरी वेगळं सांगतोय असं वाटत होतं. रात्री उशीरापर्यंत तो जागाच होता.



## स्टेशन सुटलं

"माकडू, उठ. आज आपल्याला ट्रीपला जायचंय ना?" आईनं त्याला हलवलं. माकडूला रात्री उशीरा झोपायची सवयच होती. अगदी डोळे मिटेपर्यंत तो टिवल्याबावल्या, टाईमपास करत बसायचा. मग सकाळी उठायला व्हायचा उशीर. "बघितलंस का, कडू-वाकडू कधीचे तयार आहेत."

वाकडू होता माकडूचा दादा. त्याची शेपूट टोकाला थोडीशी वाकडी होती, म्हणून तो वाकडू; अन् कडू होता त्यांचा मावसभाऊ. त्याला सगळे कडू पदार्थ खूप आवडायचे. ते दोघं माकडूपेक्षा थोडेसे मोठे होते. माकडू होता टोळीत सगळ्यात लहान. म्हणून तो झाला होता लाडोबा. त्यात तो खूप गोड खायचा, सारखा कडेवर (पोटाशी) बसायचा, त्यामुळे गब्बू झाला होता. आई सोडून बाकी सगळे त्याला लाडूच म्हणायचे."

('म्हणजे इरा ना?' ईशान कुजबुजला. बाबानं डोळे वटारले. इरानं ते बोलणं ऐकलं होतं. इतर वेळा तिनं जोरात भोकाड पसरलं असतं, ईशानला मारलं असतं. पण आत्ता गोष्ट ऐकायची म्हणून ती गप्प बसली.)

ट्रीपची आठवण झाल्यावर माकडू पटकन् उठला. आई म्हणाली, "लवकर आवर. परवा माझ्या अंगावर शी-शू केलीस. आठवतंय ना? तसं परत केलंस तर याद राख."

माकडूनं पटकन आवरलं. त्यांना काय, दात घासायचे नाहीत, आंघोळ नाही की कपडे बदलायचे नाहीत. मज्जा ना?

मग माकडूनं इकडं-तिकडं पाहिलं. रात्री ते एका मोठ्या आंब्याच्या झाडावर झोपले होते. त्यांच्या टोळीतली वानरं इकडं-तिकडं बसली होती. कुणी उगाचच एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उड्या मारत होतं, कुणी उन घेत होतं, तर कुणी दुसऱ्याच्या अंगावरच्या उवा शोधून खात होतं. (ईऽऽ!)



माकडूचे बाबा झाडाच्या शेंड्यावर उन खात बसले होते. ते खूप ताकदवान अन् रागीट होते. टोळीतले सगळे, माकडूची आईसुद्धा त्यांना खूप घाबरायची. आपल्या घरासारखं नव्हतं.

त्यांनी जोरजोरात हुप्प-हुप्प केलं अन् दुसऱ्या झाडावर उडी मारली. त्यांच्यामागून सगळे निघाले. खरंतर माकडू आत्ता कुठं नीट जागा झाला होता. थोड्या उड्या माराव्यात, दंगामस्ती करावी असं त्याला वाटत होतं. झाडावरच्या कावळ्यांबरोबर शिवाशिवी खेळावी, झाडाखालच्या बिळातून सशाची पिल्लं डोकावत होती, त्यांना घाबरवावं असे बरेच खेळ त्याला सुचत होते. पण आईनं त्याला उचलून पोटाशी धरलं अन् ती उड्या मारत निघाली. झाडाच्या फांद्या, वरचं आकाश आईला चिकटून बसलेल्या माकडूच्या जवळ येत होतं, लांब जात होतं, गरागरा फिरत होतं. त्याला खूप मजा वाटत होती अन् पोटात गोळाही येत होता.



संजूचं घर जवळ आलं. हे घर म्हणजे काय ते माकडूला नीट कळलं नव्हतं. बाकीचे म्हणायचे म्हणून तो म्हणायचा. तसं माणसांविषयी बऱ्याच गोष्टी त्याला कळल्या नव्हत्या. उदा. त्यांचे रंग नेहमी कसे बदलतात. त्यांच्याकडचे प्राणीही किती प्रकारचे होते! लहान, मोठे, वेगवेगळे आवाज करणारे. कुणाच्या तो पाठीवर बसायचा तर कुणाच्या पोटात. तसंच कुठं, कधीही वानरं दिसली की, माणसं त्यांना घालवायला बघायची. माणसं आपल्याला एवढी का घाबरतात अन् वानरंही लगेच दूर का पळतात हे माकडूसाठी कोडंच होतं.

तर ते संजूच्या घराजवळ पोहोचले. सगळे सावध झाले. माकडूचे बाबा रानात कुण्णाला घाबरायचे नाहीत. पण तेही गंभीर झाले. मोठ्या मावशीनं सगळ्या पिल्लांना जवळ बोलावलं. "हे बघा, कुणीही घराजवळ, विहिरीकडे जायचं नाही. तिथल्या झोपाळा, घसरगुंड्यांवर खेळायचं नाही. आईजवळ राहायचं. खूण केली की लगेच निघायचं. रेंगाळायचं नाही. कळलं?"

तर, ते बागेत पोचले. तिथं त्यांनी काय केलं, ते तुम्हाला माहितीच आहे. त्याची गोष्ट उद्या."

## प्रवास झोपेतला...

''एऽऽ हे रे काय बाबा, अशी अर्धी गोस्त काय सांगतोस, पूर्ण सांग ना.... अन् अशी कशी त्यांची ट्रीप? नुसती दंगामस्ती अन् खाणंच?''

ईशानलाही पूर्ण गोष्ट ऐकायची होती. पण आजची गोष्ट लांबली होती. त्याला आली होती झोप. म्हणून तो समजूतदारपणे म्हणाला, ''ईरू, बाबा उद्या सांगीन म्हणालाय ना? मग ऐकायचं. नी ट्रीप अशीच असते. शाळेच्या ट्रीपला टीचर अशाच सूचना देतात. तू मोठी झालीस की कळेल.''

गोष्टीसाठी आणखी हट्ट करावा असं इरावतीला वाटलं. पण तिचेही डोळे मिटायला लागले होते अन् त्यासमोर येत होता माकडू, त्याच्या घरचे. पण आता ती फक्त हुप्पहुप्प करत झाडावर उड्या मारणारी वानरं राहिली नव्हती. ते आता फक्त कधीतरी दिसलेले, गमतीशीर प्राणी नव्हते, तर माकडूला आता एक नाव, आईबाबा, दादा होते, मावश्या होत्या, माकडूला एक निश्चीत आकार आला होता.

अन् बाबाच्या गोष्टीपेक्षा ही आत्ता दिसणारी चित्रं जास्त जीवंत, रंगीत झाली होती, जास्त हवीशी वाटत होती.

...हुप्पहुप्प करून दणादण उड्या मारणारे माकडूचे रागीट बाबा अन् त्यांची टोळी... झाडांच्या सावलीत हलणारी, क्षणात अदृश्य होणारी... जणू जीवंत, वेगळे प्राणीच असावेत अशा त्यांच्या लवलवत्या शेपट्या... आईच्या पोटाला चिकटलेला, तिच्याकडे मान वळवून बघणारा माकडू... किचकिच करत तो इराला काहीतरी सांगत होता, पण काय ते नीट कळण्यापूर्वीच ती गाढ झोपी गेली.

**आणि कल्पनेतला**

सगळे झोपून गेले, पण बाबा जागाच होता. तो विचार करत होता. माकडूला माणसांविषयी जे प्रश्न पडले, ते त्याला अगदी आयत्या वेळी सुचले. आधी तसं काही त्याच्या डोक्यातही नव्हतं. ते कसे सुचले याचं त्याला आश्चर्य वाटत होतं.

खरंच, काय वाटत असेल माकडूला माणसांविषयी? त्यांच्या जगाविषयी?

... घरं म्हणजे काय हे माकडूला नीटसं कळलं नव्हतं. ती का बांधतात तेही... माकडूच्या टोळीतल्या सगळ्यांना घरं बांधणारे दोनच प्राणी माहीत होते, पक्षी अन् माणसं; अन् त्यांना त्यांच्याविषयी कीवच वाटायची. चांगला खायचा, खेळायचा वेळ कसा वाया घालवतात... 'भरलेलं पोट अन् दमलेलं शरीर असलं की कुठंही झोप लागते' असं माकडूची एक आजी नेहमी म्हणायची.

अंडी उबवून पिल्लं वाढवण्यापुरतं पक्षी घरटं बांधायचे. माकडूनं पक्ष्यांची नवजात पिल्लं पाहिली होती. नुसता मांसाचा गोळा. (ती खूप छान लागतात असं त्याचा एक दादा सांगायचा!) त्यांना वाढवण्यासाठी घर हवंच; अन् ते घरटं बांधायचेही कसे? खूप शोधलं, तरच सापडेल असं. झाडानं घरट्यासाठी मुद्दाम जागा सोडली आहे असं. जणू झाडाचाच तो एक अवयव असावा असं....

पण ही माणसांची घरं? त्यातल्या त्यात जुनी घरं एवढी बोचायची नाहीत. ती तिथल्याच मिळणाऱ्या मटेरियलपासून बनवलेली असायची. ते जुनं व्हायचं तसं जास्त छान दिसायचं. जवळपासची झाडी, मागचे डोंगर त्याला आपल्या कुशीत घ्यायचे. पण ही नवीन घरं? एखादं खूप छान मैदान किंवा झाडी असायची. मग अचानक खूप माणसं आणि त्यांचे मोठेमोठे प्राणी तिथे काहीतरी करायला लागायचे. ते प्राणीही कसे? चकचकीत, कडक अंगाचे, भलेमोठे, सतत प्रचंड आवाज करणारे, धूर सोडणारे....

मग काही दिवसांनी मध्ये एक मोठा अंधारा अडथळा उभा राहायचा. बाजूला उंच भिंती, काटेरी तारा. भरपूर सिमेंट, लोखंड वापरलेलं, बटबटीत रंग दिलेलं, तिथलं हवामान, निसर्ग यांचा विचार न करता बांधलेलं ते घर उन्हाळ्यात तापायचं, थंडीत गार पडायचं, पावसाळ्यात गळायचं. दोन-तीन वर्षांत रंग ओघळून बिचारं दिसायला लागायचं. हे माणसाचं घर!

## ॲक्सिडेंट

नेहमीची गोष्टीची वेळ टळून गेली, तरी इरा काही आली नाही. थोडी वाट पाहून बाबानं तिला विचारलं, "काय ग, आज गोस्त ऐकायची नाही?"

"नाही, आज मला तुझी गोस्त नको. आईची पाहिजे."

"का ग?"

"तू आज कुठली गोस्त सांगणारेस मला माहित्ये."



"मी रोज माकडूचीच गोष्ट सांगतो ना -"

"पण आज तू माकडूनं कसं आईचं ऐकलं नाही, फक्त गोडगोड फळं, वर इरावतीनं दिलेल्या गोळ्या, चॉकलेटं हावरटासारखी खाल्ली, वर तोंड धुतलं नाही, मग त्याचं पोट दुखायला लागलं, तो गडाबडा लोळायला लागला ती गोस्त सांगणारेस, मला माहित्ये. मला नकोय ती."

"आई, मला तूच गोस्त सांग. अन् माकडूची नको, दुसरी सांग. मला नाही आवडत तो माकडू-फिकडू!"

नंतर दोन-तीन दिवस इरावती अजिबात गोष्ट सांग असं म्हणाली नाही. बाबाच्या लक्षात आलं, 'तुम्ही खुशाल गोष्टी बनवा, त्यात गंमत-गोंधळ घाला, कल्पनेच्या भराऱ्या मारा. ते सगळं आम्ही ऐकू, त्याची मजा घेऊ. पण आम्हाला त्यातून काही शिकवायला, उपदेश करायला जाऊ नका. आम्हाला ते नकोय. गोष्टीतून काय शिकायचं ते आम्हाला ठरवू दे...'

खूप दिवस ही तोतनाची गोस्त चालू होती. पण बाबा तशीच्या तशी गोष्ट कधीच सांगायचा नाही. प्रत्येक वेळी नवीन काहीतरी घडायचंच. कधी माकडू विहिरीत डोकावून बघायचा. (त्याबद्दल त्याला चोप मिळायचा.) त्यात त्याला स्वत:चं प्रतिबिंब दिसायचं. त्यावरून कोल्हा कसा दुष्ट सिंहाला विहिरीपाशी घेऊन जातो अन् स्वत:च्याच प्रतिबिंबावर उडी मारून सिंह मरतो, ती गोष्ट व्हायची. कधी माकडू होडीतून समुद्रात जायचा हट्ट करायचा. त्याला जोडून 'वानर, मगर व जांभळाची' गोष्ट यायची.

पण एक दिवस गोष्ट मध्येच थांबवून इरा म्हणाली, "ए, हे रे काय बाबा, तू वेगळ्याच गोष्टी घुसडतोस? जरा माकडूची नवीन गोष्ट सांग ना! किती दिवसात नाही सांगितलीस!"

"अगं, पण नवीन गोष्ट पूर्ण तयार झाली नाही अजून... अन् माझा मूडही नाहीये. रोज नवीन गोष्ट सुचायला मी काय लेखक आहे का?"

"बाबा, उगीच शाईनिंग खाऊ नकोस हं, आहेचेस की तू! मी वर्गात, ग्राऊंडवर मित्रांना सांगितल्या माकडूच्या गोष्टी. सगळे म्हणाले भारी आहेत म्हणून."

"तू या गोष्टी तुझ्या मित्र-मैत्रिणींना सांगतेस?" बाबानं थोड्या आश्चर्यानं विचारलं, पण मनातून त्याला थोड्या गुदगुल्या झाल्याच. "मग? कशा वाटल्या त्यांना गोष्टी? आवडल्या?"

"होऽऽ ते आता मला विचारतात, नवी गोष्ट नाही का. पण तू आता गोष्ट सांग."

थोड्याशा अनिच्छेनेच बाबानं गोष्ट सांगायला सुरुवात केली.



"सगळी मोठी माकडं झोपल्यावर माकडू अन् त्याचे भाऊ गूपचूप झाडावरून उतरले. आताशा ते रोज रात्री तसे जायचे; अन् आज तर त्यांनी भारी प्लॅन ठरवला होता. आकाशात उंच उडणाऱ्या पक्ष्यांचा माकडू कंपनीला भलताच हेवा वाटायचा. आपल्याला तसं उडता कसं येईल यावर त्यांचे सतत बेत चालायचे. ते जमत नसेल, तर काहीतरी करून आकाशात उडायची त्यांची फार इच्छा होती. पण गरूड, ससाणा अशा शिकारी पक्ष्यांपासून सावध राहायला त्यांच्या आईबाबांनी त्यांना अगदी लहानपणापासून शिकवलं होतं. मग काय करावं?

त्यांच्यातल्या वाकडूनं आयडीया काढली. ते झोपायचे, त्या झाडावर रात्री खूप वटवाघळं यायची. वाकडूनं त्यातल्या एका वटवाघळाला रोज गोड फळं देऊन, गप्पा मारून पटवलं होतं. आज त्यानं माकडू कंपनीला चक्कर मारून आणायचं कबूल केलं होतं.





ते वटवाघळाच्या झाडावर पोचले. ते त्यांची वाटच बघत होतं. पहिली चक्कर कुणी मारायची यावरून त्यांच्यात थोडी हमरातुमरी झाली. पण मग सुकडू त्यांच्यात सगळ्यात हडकुळा होता, म्हणून त्याला पहिली चक्कर घ्यायचं ठरलं.

वटवाघळानं ('त्याचं नाव काय होतं बाबा?' इरावती. 'थांब गं जरा' इशान.) सुकडूला आपल्याला गच्च पकडून धरायला सांगितलं. उडताना कसं वाटेल, काय काय दिसेल याच्या कल्पना सगळे मनातल्या मनात करायला लागले.

जरासं घाबरतच सुकडूनं वटवाघळाला पकडलं. वटवाघळानं फांदी सोडली-''

इरावती अन् ईशान, ''आणि?''

''आणि काहीऽऽ नाहीऽऽ. वटवाघूळ अन् सुकडू दोघंही दाणकन् खाली आपटले. वटवाघळात तेवढी शक्तीच नव्हती. तरी बरं, खाली खूप गवत होतं, दोघांनाही लागलं नाही.''

''मग?''

''मग काही नाही. निराश होऊन सगळे परतले. त्यांची चांगलीच फजिती झाली.''

''हं. पुढे सांग ना-''

''पुढे काही नाही. गोष्ट संपली. तेच मी तुला सांगतोय, अजून गोष्ट सगळी तयार झाली नाही.''

''एऽऽ, हे रे काय बाबा, ही कसली फुसकी गोष्ट?''

## साईडींग

बाबा आठ दिवस बाहेरगावी गेला होता. तो रात्री साडेदहा-पावणेअकरा वाजता आला. बघतो तर घरात शांतता. त्याला आश्चर्य वाटलं. सहसा तो यायचा तेव्हा मुलं वाट बघत असायची. घरात शिरल्याशिरल्या इरावती त्याला चिकटायची अन् ठरलेला प्रश्न विचारायची, ''बाबा, मला काय आणलंस?'' ईशान गप्प उभा असायचा, पण त्याच्या डोळ्यात तोच प्रश्न असायचा. मग आई, आजीचं ओरडणं, ''अगं, आता दमून येतोय तो. आल्या आल्या.. जरा टेकू तर देत त्याला.'' पण आणलेली गम्मत, खाऊ लगेच दाखवावं, मुलांच्या चेहऱ्यावरचे भाव बघावेत असं बाबालाही वाटायचंच. मग इरावतीचे शंभर प्रश्न, गेल्या आठ दिवसांत घडलेली प्रत्येक गोष्ट सांगायची तिची, ईशानची चढाओढ...

''का ग, मुलं झोपली?''

''हो, आत्ताच रडून, हट्ट करून झोपली ती.'' पाणी देतादेता आई उत्तरली.

''का? काय झालं? बरं वाटत नाहीये का तिला?''

''बरं नसायला काय झालं? तिला गोष्ट हवी होती- माकडूची.''

''मग सांगायची.'' बाबा म्हणाला. आई काही बोलली नाही. बाबानं विचारलं ''तू ही चिडल्येस का दमल्येस? का दोन्ही?''



आईनं बाबाकडे पाहिलं. तिचा राग (का थकवा?) पळाला. ती छान हसली. "ती मुलगी किती हट्टी आहे, माहित्ये ना? तुझ्यावरच गेल्ये ती. आठवडाभर तिला त्या माकडूच्या उड्डाणाची गोष्ट सांगत्ये. तर आज म्हैस म्हणते काय, 'आई, अशी काय गोष्ट सांगत्येस? रोज सेमसेम. बाबा कसं रोज काहीतरी नवीन सांगतो. होऽऽ कीऽऽ नाई रे दादाऽऽ?"

"आठवडाभर तू नाहीस. दिवसभर नुसती धावपळ. मला आवडत नाही, तरी गोष्ट सांगायची. वर हे? मी चिडले. म्हणाले, आयुष्यात तुला पुन्हा गोष्ट सांगणार नाही. मग रडून झोपली... पण यातनं एक बरं झालं. माझी गोष्ट प्रकरणातून सुटका झाली. तू, तुझी मुलं अन् तुझ्या गोष्टी. मला रात्री निवांत वाचता, काम करता येईल."

यावर काय बोलावं ते बाबाला सुचलं नाही. हल्ली त्याचं वाचन जवळजवळ बंदच झालं होतं. आधी घरी यायला उशीर. मग इराचं जेवण, झोप. मग ऑफिसचं काम. मग वाचन कुठलं? खरं तर चांगलं पुस्तक थोडं जरी वाचलं, तरी त्याचा दिवसभराचा शीण जायचा. पण आता माकडूच्या गोष्टी तयार करण्यातून (त्या कश्याही असल्या तरी) आपल्याला तेवढाच आनंद मिळतोय हे बाबाला स्वत:लाच नीट कळलं नव्हतं.



माकडूचे बाबा सोडून बाकी सगळे माना खाली घालून उभे होते. संजूची आई त्यांना जोरजोरात सुनावत होती. ''काहीऽऽ वाटत नाही ना? पिल्लं ती पिल्लं. पण तुम्ही मोठेसुद्धा तसेच? सगळ्या बागेची वाट लावलंनी. मोहोर, कैऱ्याच काय, फांद्याही मोडल्यात. आता तुम्हाला अन् आम्हाला - आंबे कुठनं मिळणार? आता इरा, ईशान येतील. त्यांना काय सांगू?''

यावर माकडूची आई म्हणाली, ''खरंय तुमचं, आमची चुकी झाली. पण संजूच्या आई, बघताय ना तुम्ही, मुलांनी खेळावं, हुंदडावं अशी जागा राहिल्ये कुठे? रान म्हणून काही उरलंय? मग मुलांनी काय करावं? बघावं तिकडे उंच गडगे नाहीतर तारेची कम्पांऊंडं. त्यातून आत जावं, तर कुत्री काय सोडतात, बार उडवतात, फायरींग करतात... मग तुम्हीच सांगा. चान्स मिळाल्यावर मुलं काय सोडणारेत? ''

''चान्स? फायरींग? इंग्लीशची शिकवणी लावलीस की काय, किनरे?''

''अहो, बीचवर एवढी माणसं येतात, ऐकूनऐकून चार शब्द शिकले झालं! ते जाऊ दे. तुमची एवढी लुसकानी झाली. त्याचं काय करायचं? आम्हाला झेपतील अशी चार कामं सांगा. तेवढी करून देतो.''

संजूच्या आईनं विचार केला. आता वानरांना काम सांगायचं, म्हणजे मुलांना काम सांगण्यासारखंच, आपलीच कामं वाढवून ठेवायची. पण यांना धडा तर मिळालाच पाहिजे. काय काम सांगावं बरं?... लाईट दोन दिवस बंद होते. बागेला पाणी हवंच होतं. नारळदेखील काढायला हवे होते. ते काढणारा शंकर आठ दिवस आला नव्हता. त्याला मजुरी वाढवून हवी होती. ''बरं तर, सुपारीची बाग शिंपायची अन् माडावरच्या नारळी काढायच्या. पण पाणी नासायचं नाही. फक्त तयार नारळ काढायचे. झाडाची नासाडी करायची नाही. एकदा तुम्ही झाडावर गेलात की, सगळं भान सुटतं तुमचं, म्हणून सांगते'' संजूची आई म्हणाली.





माकडूचे दोन ताकदवान दादा रहाटावर बसले. तो पायरहाट होता. पायानं फळी दाबली की दोरी अन् त्याला जोडलेले डबे खाली जायचे. पाणी भरून वर यायचे. दादांनी काम सुरू केलं. रहाटाचा कुईकुई आवाज यायला लागला. माकडू-कडू दादाच्या मागे लागले. त्यांनाही रहाट फिरवावासा वाटत होता. पण दादा म्हणाला, तुम्ही अजून लहान आहात. तुम्हाला झेपणार नाही.

धोधो करत पाणी टाकीत पडू लागलं. सूर्यप्रकाश पडून त्यात इंद्रधनुष्याचे रंग दिसू लागले. तिथून पाटानं पाणी सुपारी, नारळांच्या बुंध्यांशी जाऊ लागलं. पाणी बघून माकडू, कडू, वाकडूला त्या लोटाखाली उभं रहावंसं वाटत होतं. वाकडूला आणखी भन्नाट आयडिया सुचत होत्या. रहाटाच्या त्या डब्यात जाऊन बसलं तर? त्या दोराला धरून लोंबकळत वरखाली करावं.... पण संजूची आई बघत होती ना....

तिकडं माकडूची आई, मावश्या नारळीवर चढल्या. त्यांनी बदाबदा नारळ खाली फेकायला सुरुवात केली. एका झाडावरचे काढून झाले की डायरेक्ट दुसऱ्या झाडावर धप्पकन उडी! की परत नारळांचा पाऊस. खाली कुणी उभं नव्हतं म्हणून बरं!

एका तासात दोन्ही कामं पूर्ण झाली. संजूच्या आईनं त्यांना घरात बोलावलं. नारळाच्या वड्या, कोकम दिलं. म्हणाली, ''चार गड्यांचं काम तुम्ही तासांत केलंत, शाब्बास! तुम्ही मारुतीचे वंशज आहात, जरा शहाण्यासारखं वागावं, काय?''

त्यांना द्राक्षं, मोसंबी दिली. आपल्याकडे ही फळं येत नाहीत, अपूर्वाईची आहेत असंही म्हणाली. वानरांनी संजू, त्याच्या आईला अच्छा केलं. भरल्या पोटानी, आनंदी मनानं वानरसेना परतली...

## इंजिन खोललं

एकदा घरी आई नी ईशान दोघंच होते. बरेच दिवस ईशानला एक शंका छळत होती. पण ती विचारावी की नाही हे त्याला कळत नव्हतं. धीर करून त्यानं आईला विचारलं, ''आई, बाबा सांगतो त्या गोष्टी खऱ्या नाहीयेत ना ग?''

''म्हणजे काय रे?''

''म्हणजे असं काही खरं घडत नाही ना? माकडं वटवाघळावरनं चक्कर काय मारतात, माणसांची कामं काय करतात. इरूला सगळं खरं वाटतं, पण -''

आईनं लगेच उत्तर दिलं नाही. तीही विचार करायला लागली. ईशान काही बोलत नाही, हे बघून तिनं विचारलं, ''अरे, ती गोष्टच नाहीये का? गोष्टीत असं होत नाही का?''

''गोष्टीत होतं, पण हे काहीतरी... '' काय वाटतंय ते ईशानला शब्दात मांडता येत नव्हतं.

मग आई बोलायला लागली, ''हे बघ, तू इसापनीती वाचलीस ना? त्यात नाही का प्राणी बोलत?''

''होऽऽ, पण त्या लिहिलेल्या गोष्टी आहेत; अन् त्या सारख्या अशा बदलत नाहीत... परत त्या गोष्टींमध्ये आपण कुठं असतो?''

''अरे, बाबाला गोष्ट सांगताना जे सुचेल, ते तो गोष्टीत घालतो. मग गोष्ट नवीन वाटते. तुला हॅरी पॉटर आवडतो ना? त्यात किती जादू आहेत. त्या खऱ्या आहेत का?''

'ते सगळ खोटं आहे' असं ईशानला म्हणवेना. आई म्हणाली, ''मी सांगू, तुला माहित्ये की अशा जादू घडत नाहीत. पण मनातून मात्र तुला खूप वाटतं की, हॅरी पॉटर खरा आहे, त्याची शाळा कुठंतरी असेल, हो ना?''



ईशानचा चेहरा खुलला. ''हो'' तो पुटपुटला.

''अरे, मग तसंच या गोष्टींचं आहे. त्यातली माणसं, प्राणी, घटना खऱ्या आहेत, आपण त्यांना भेटलोय, ते प्रसंग आपल्या डोळ्यासमोर घडतायत असं जर मनापासून वाटलं, तर ती खरी गोष्ट आहे. तुला हॅरी पॉटर आवडतो ना? तो जिंकावा असं वाटतं की नाही? आणि लॉर्ड वॉल्डेमार्टची भीती? ती खरी आहे ना?''

''हो'' ईशान उत्तरला.

''म्हणून ती चांगली गोष्ट आहे.. तुला आजी महाभारतातल्या गोष्टी सांगते. त्यात माणसाचं हरिण होतं, राक्षस डोंगराएवढा होतो. जर तुला ते खरं वाटलं, तर ती खरी गोष्ट. गोष्टच, पण खरी गोष्ट.''

दोघंही नंतर बराच वेळ काही बोलले नाहीत. आईनं यावर आधी काही विचार केला नव्हता. जे लगेच सुचलं, ते ती बोलली. त्याचा पूर्ण अर्थ ईशानला कळणं शक्य नव्हतं. पण एक मात्र नक्की घडलं होतं. इतकं दिवस जणू तो आणि या गोष्टी, सिनेमे यांत एक अदृश्य काच होती, पडदा होता. त्यापलीकडे जावं का नाही हे त्याला उमगत नव्हतं. ती काच, तो पडदा आज नाहीसा झाला होता.

माकडूच काय, हॅरी पॉटर, पोकेमॉन, भीम, कृष्ण, राम, मारुती... सगळे आता जास्त स्पष्ट झाले होते. त्याच्या जास्त जवळ आले होते. त्यांच्याशी कसं वागायचं, त्यांचं काय करायचं हे त्याला उमगलं होतं.

कितीही वय वाढलं, तरी कल्पनेतलं हे सुंदर-भयंकर जग ईशानसाठी शिल्लक राहणार होतं. ही सुष्टदुष्ट पात्रं त्याची आयुष्यभर सोबत करणार होती.

केवढा मोठा शोध आपल्याला लागलाय, केवढी देणगी आपल्याला मिळाल्ये हे कळण्याचं त्याचं वय नव्हतं... पण असं तरी कसं म्हणावं? कारण खूप दिवसांनी त्यानं पटकन् आईचा अकारण पापा घेतला अन् तिच्या मांडीवर डोकं टेकून तो पडून राहिला.

आणि नेहमीसारखी आईनंदेखील त्याची या गोष्टीवरून टिंगल केली नाही. त्याच्या केसांत हात फिरवत ती शांत बसून राहिली.

## डायव्हर्शन

एक दिवस इरा घरी आली, तर कोचावर एक उघडेबंब आजोबा, लुंगी घालून बसलेले. ''इरू, हे भाईआजोबा. भाईकाका, ही इरावती.'' बाबानं त्यांची ओळख करून दिली.

इरा त्यांच्याजवळ जाऊन बसली. ''आजोबा, तुम्ही कुठं राहाता?'' तिनं विचारलं.

''जंगलात'' आजोबांनी उत्तर दिलं.

''जंगलात? म्हणजे खऱ्या जंगलात? वाघाजवळ?''

''जंगलात राहतो, पण एका झोपडीत. वाघ येतो कधीकधी भेटायला.''

''हो? तुम्ही घाबरत नाही-शूर आहात? पण तिथं करता काय?''

''चित्रं काढतो''.

इराला हे आजोबा भयंकरच आवडले. कपड्यांचं तिला फार प्रेम नव्हतं. 'इरा, कपडे घाल ना.' असं आईनं सांगितलं की 'ही काय, चड्डी घातल्ये की.' असं तिचं उत्तर असायचं. त्यामुळं हे बंबू आजोबा बघून आधीच तिला बरं वाटलं होतं. त्यात जंगलात राहणारे-म्हणजे शूर. वर एवढे मोठे असून 'काय करता?' ला 'चित्रं काढतो' असं उत्तर देणारे. तिच्या माहितीत जी कुणी मोठी माणसं होती, त्यातलं कुणी डॉक्टर होतं, कुणी शिक्षक, तर कुणी ऑफिसात. पण मोठं असूनही चित्र काढणारं पहिलंच माणूस तिला भेटत होतं.



आता ती थेट आजोबांच्या मांडीवरच जाऊन बसली. ''आजोबा, मला जंगलाची गोष्ट सांगा ना.''

हे भाईआजोबा खरे आजोबांचे मित्र. पण आता ते बाबाचेच घट्ट मित्र झाले होते. ते होते मोठे चित्रकार. त्यांची मुलं शहरात राहायची. पण ते जंगलात, आदिवासी माणसांमधे, त्यांच्यासारखचं राहायचे. कधीतरी ते शहरात यायचे. दोनतीनदा नातवंडांना भेटून यायचे, पण राहायचे मात्र इराकडेच.

आजोबा असेपर्यंत इरा त्यांना चिकटून होती. दोघांनी मिळून खूप चित्रं काढली. दोघं कुठंकुठं भटकून आले. पण ते कुठेकुठे गेले, त्यांच्या काय गप्पा चालायच्या ते त्या दोघांनाच ठाऊक. ईशान त्यांच्याकडे भयचकीत नजरेनं, दुरुन बघत राहायचा.

एक दिवस जेवताना माकडूचा विषय निघाला. ''हा कोण माकडू?'' आजोबांनी विचारलं.

''म्हणजे काय आजोबा? जंगलात राहाता ना तुम्ही अन् तुम्हाला माकडू माहीत नाही?''

नंतर बाबानं बरीच टाळाटाळ, उडवाउडवी केली, पण आजोबांनी पिच्छा सोडला नाही. अखेरीस बाबाला माकडूच्या कहाणीचे कागद त्यांना द्यायलाच लागले.

''चांगलं लिहिलंस की तू. मला आवडलं. पण मग दाखवायला एवढं लाजत का होतास?'' दोन-तीन दिवसांनी ते वाचून झाल्यावर आजोबांनी बाबाला विचारलं.

''हँ, चांगलं काय, काहीतरी चाळा म्हणून लिहिलंय, भाईकाका. इरावतीचा हट्ट. अन् कसं झालंय मला स्वत:लाच कळत नाहीये.''

''मला लिखाणातलं काही कळत नाही, पण मी कसं काम करतो सांगू? सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे काम करताना मला मजा येते ना? दुसरं,बघताना खूप जीवंत इमेजेस् डोळ्यासमोर येत आहेत का... तुला या गोष्टी सांगताना मजा येते ना? ज्यांच्यासाठी लिहितोयस ते एन्जॉय करतायत ना? मग छान आहे की! जास्त विचार कशाला करतोस?''



हे ऐकून बाबाचा चेहरा उजळला.

आजोबा जायच्या दिवशी इरानंही तिची छोटी सॅक भरायला सुरुवात केली. ती दाखवत तिनं आईला सांगितलं, ''आई, एवढे कपडे पुरतील ना ग? आजोबा म्हणाले, नाहीतरी तिथं जास्त कपडे कुणी वापरतच नाही.''

''तू काय खरंच निघालीस की काय भवाने?''

''म्हणजे काय, तुला सांगितलं होतं की मी! मग माझी खूप आठवण येईल ना ग तुम्हाला? करमणार नाही ना? पण थोड्याथोड्या दिवसांनी येईन हं मी आजोबांबरोबर.''

यानंतर काय झालं ते मी सविस्तर सांगत नाही. थोडक्यात, आई, बाबा, आजी यांनी खूप समजूत घातली, प्रलोभनं-लालूच दाखवली, सुट्टीत सगळ्यांनी मिळून माकडू-आजोबांकडे जायचं कबूल केलं, तेव्हा कुठं तिनं बेत बदलला.

आजोबांना सोडायला बाबा स्टेशनवर गेला होता. तो आजोबांना म्हणाला, ''आम्हाला आश्चर्यच वाटतंय. इराचं अन् तुझं एवढं जमलं कसं? तशी ती चिकटूच आहे. पण लहान मुलं तुला घाबरून असतात. हो ना? ईशान बघ ना, लांबून सगळं बघत होता. मी लहानपणी तुला किती घाबरायचो, आठवतंय?''

आजोबांचे डोळे चमकले. ते आणि इरावती यांच्यात किती धागे जोडले आहेत ते त्यांना जाणवलं होतं. त्यांची चित्रकला, जंगलात राहाणं, उघडं वावरणं... अन् त्यांना आता भासणारी माणसांची, नातवंडांची ओढ...

पण यातलं काही ते बोलले नाहीत. ते एवढंच म्हणाले, ''कळलं नाही तुला? सोप्पं आहे! मी सेम माकडूच्या टोळीतला मेम्बर दिसत नाही का?'' अन् खदाखदा हसत ते गाडीत चढले.

बाबा काही बोलण्यापूर्वीच गाडी हलली. खट्याळ हसत, हात हलवत निरोप देणाऱ्या भाईकाकाचं रूप बाबा नीट पाहू लागला.

सुंदर काळाशार रंग, शरीरभर पांढऱ्या केसांचे पुंजके, उंच अंगकाठी, लवचिक स्नायू अन् सगळ्या जगाकडे रागीट, चौकस भावानं बघणारी अलिप्त नजर...

## जोरात पण जागेवरच!

सगळीकडे अंधारगुडुप. मधलं मैदान मात्र मोठमोठ्या दिव्यांच्या प्रकाशामुळे लख्ख उजळलेलं. खूप गर्दी, हवेत तरंगणारी धूळ, गर्दीचा गोंगाट, मुलांचं किंचाळणं, विक्रेत्यांच्या आरोळ्या, वेगवेगळ्या टेपमधनं येणारा दहा-वीस ठेकेबाज गाण्यांचा दणका, खाण्या-पिण्याचे, खेळण्याचे, नेमबाजीचे खूप स्टॉल - जत्रा अगदी भरात आली होती.

अन् तिथली नाना प्रकारची फिरती चक्रं. हातांनी फिरवायची, रंगीबेरंगी घोड्यांची, वेगवेगळ्या प्रकारच्या गाड्यांची, सी-सॉसारखी झुलणारी, प्रचंड वरखाली होणारी होडी; आता आपण पडणार अशी भीती वाटायला लावणारी, पण पडणार नाही याची खात्री असल्यामुळे मजेदार वाटणारी.

पण माकडू आणि मंडळींचं लक्ष खिळलं होतं, उंच गोलाकार फिरणाऱ्या पाळण्यांवर. एका पाळण्यात दोनजण बसायचे. तो पाळणा थोडा वर जायचा. असे सगळे पाळणे भरले की, चक्र फिरायला लागायचं. आधी हळूहळू, मग वेग वाढायचा. वर जाणारा पाळणा आधी थोडासा अन् नंतर झपकन तिरका व्हायचा, कलंडायचा, आतली माणसं खाली पडणार असं वाटायचं. बरेच जण तर जोरात किंचाळायचे. ते भीतीमुळं की आनंदानं ते कळायचं नाही.

हळूहळू चक्राचा वेग कमी व्हायचा. पाळणे थांबायचे. माणसं उतरायची. निघून जायची. पण नंतर बराच वेळ त्या गतीची धुंदी त्यांच्या चेहऱ्यावर दिसत राहायची...

माकडू, वाकडू, कडू अन् त्यांचे दादा डोळे फाडून फिरणाऱ्या चक्राकडे पाहत होते. किती वेळ कुणास ठाऊक!

पण ते तिथे आले कसे?

आठ दिवस ते झाडीतून हा लखलखाट पाहात होते. गोंगाट ऐकत होते. मोठी वानरं तर त्यानं त्रासून, घाबरून गेली होती. पण माकडू आणि मंडळींना मात्र कधी एकदा हे सगळं आपण नीट जवळून बघतोय असं झालं होतं.

माकडू आता पिल्लू राहिला नव्हता. रात्री मोठ्यांची नजर चुकवून दादांबरोबर पसार होण्यात तोही पटाईत झाला होता. त्याप्रमाणे आता ते सगळे जांभळाच्या मोठ्या झाडावर बसून हावऱ्या डोळ्यांनी जत्रा बघत होते. बराच वेळ एकाच्याही तोंडून शब्दही फुटला नाही. मग एकेकजण आपल्याला आवडलेल्या गोष्टीचं, जणू दुसऱ्यानं ती पाहिलेलीच नाही अशा प्रकारे वर्णन करू लागला. पण उंच जाणारे पाळणे सगळ्यात ग्रेट यावर मात्र त्यांचं एकमत झालं.

झाडांवरच्या उंच उड्यांमधली गंमत तर ते रोज घ्यायचे. एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उडी मारताना पडणारा मजेदार खड्डा, त्यांच्याही पोटात पडायचा. पण आपण काही करायचं नाही, नुसतं बसून राहायचं अन् पाळणाच वर-खाली गरगर फिरणार ही आयडीयाच भन्नाट होती.

पाळणा खाली येतानाच्या मुलांच्या किंकाळ्या अन् झाडावर दंगामस्ती करतानाचं वानरांचं ओरडणं इतकं सारखं होतं! त्यामुळं, खरं म्हणजे हे खेळ आपल्यासाठीच आहेत अन् नेहमीप्रमाणे घुसखोरी करून माणसं ती वापरत आहेत असंच सगळ्या माकडू कंपनीला मनापासून वाटत होतं.

"एकदा तरी बसायला मिळालं पाहिजे रे," एक दादा सातव्यांदा म्हणाला, "पहाटे कुणी नसेल, तेव्हा यायचं का?"

"अन् तेव्हा चक्र फिरणार कसं? ते फिरण्यासाठी काहीतरी दाबायला लागतं. ते कुठं माहित्ये आपल्याला? का तू एकटा ताकदीवर फिरवणारेस?" वाकडूनं खवचटपणे विचारलं.

त्याचं वाकडू हे नाव पडण्यामागे वाकड्या शेपटीबरोबर आणखीही एक कारण होतं. त्याचा चेहराही बरेचदा वाकडा असायचा. कारण त्याला खूप प्रश्न पडायचे. तो सतत विचार करायचा.

लहानपणापासून उगीचच धांगडधिंगा, दंगामस्ती करण्याऐवजी शांत बसून झाडावर, रानात, वर आकाशात काय घडामोडी घडतायत, प्राणी, पशुपक्षी, झाडं-पानं यांच्या हालचाली, बदल न्याहाळावेत, त्यावर विचार करावा, प्रश्न विचारावेत हे वाकडूला जास्त आवडायचं. बाबा चिडले, आईनं खेळायला ढकललं, मित्रांनी चिडवलं तरी तो तिकडे लक्ष द्यायचा नाही.

त्याचं विचार करणं आजकाल वाढलं होतं, पण प्रश्न विचारणं मात्र थांबलं होतं. आपल्या प्रश्नांना हे मोठे उत्तर तर सोडाच, लक्षसुद्धा देत नाहीत हे त्याला कळून चुकलं होतं. 'गप्प बस', 'त्रास देऊ नकोस' अन् त्याहून पुढे 'वानर आहेस का माणूस?' 'माणूसपणा बास कर' ही वाक्यं त्याला पाठ झाली होती.

'एऽऽ वाकडूऽऽ शोध ना काहीतरी आयडिया. तुला सुचेल. तू डोकेबाज आहेस' सगळ्यांनी त्याची मनधरणी सुरु केली. त्याची आवडती फळं-फुलं द्यायचं कबूल केलं. वाकडूचा चेहरा खुलला. ''बघू, करू काहीतरी'' त्यानं आश्वासन दिलं.



## फुलस्टॉप (सध्यापुरता)

.... बोलूनबोलून बाबाचा घसा सुकला होता. त्यानं घटाघटा पाणी प्यायलं.

"मग? थांबलास का? पुढे सांग ना?" थोडी वाट पाहून इरा म्हणाली.

"अगं, आजची गोष्ट संपली. पुढची उद्या".

"हो. आता झोपायचं. अकरा वाजून गेलेत" आई म्हणाली.

"ए बाबाऽ, प्लीज सांग ना, काय आयडिया केली वाकडूनी" ईशाननी विनवणी केली.

इरावतीचे ओठ दुमडले गेले, नाकपुड्या फेंदारल्या, आता ती 'माला आत्ताच गोस्त पायजेऽऽ' चा सूर लावणार हे आईला कळलं. तिनं घाईघाईनं इराला जवळ घेतलं. तिला थोपटत आई सांगू लागली, "अगं, आत्ताच तर त्यांनी वाकडूला विचारलंय. लगेच कसं सुचेल त्याला? जरा विचार करू देत ना. तरच भारी आयडिया सुचेल. नाहीतर फजिती होईल ना त्याची वटवाघळासारखी!"

"मी सांगू वाकडू काय करेल?" लाजत ईशान म्हणाला. "त्या रहाटगाडग्याचं चक्र करेल, हो ना?"

"दादू, भारी!" इरानं त्याला दाद दिली. "बाबू, सांग ना..."

"आयडिया तीच आहे. पण विहीरीत खाली जाताना नाकातोंडात पाणी गेलं पाहिजे, वर येताना पोटात खड्डा पडला पाहिजे, माकडू, माकडूचे बाबा, सगळं सगळं होता आलं पाहिजे. मग छान गोष्ट होईल!"

"म्हणजे खरं खरं?" इरानं विचारलं.

"नाही ग, गोष्टीमधे!" आई म्हणाली.



'एक होता–'
असं ऐकलं की आपल्याला पुढची गोष्ट दिसायला लागते.
पण या गोष्टीतली इरा आहे, तिला रोज गोष्ट हवी असायची.
म्हणून तिच्या बाबानं गोष्टी तयार केल्या
आणि या गोष्टीत इरा, तिच्या घरचे, त्यांच्या सहली,
तिथे भेटलेले कोण–कोण या सगळ्यांना आणलं.

चला, तुम्हीही ह्या गोष्टींच्या गाडीत बसा
आणि इराच्या जगाची सफर करा.



ऊर्जा प्रकाशन